# मुलांचे लाडके
# जानूस कोरचाक


लेखक: टोमेक बोगास्की
मराठी अनुवाद: तृप्ती कर्णिक

जानूस कोरचाक ह्यांचे बालपण रशियाच्या झारचं वर्चस्व असलेल्या वॉर्सात गेलं. त्यांना राजा बनून रस्त्यावरच्या गरीब मुलांसाठी एक सुंदर विश्व निर्माण करायचं होतं. ते राजा नाही होऊ शकले परंतु नावाजलेले डॉक्टर, लेखक आणि मुलांच्या हक्कांसाठी लढणारे एक वकील म्हणून ते प्रसिद्ध झाले. 1912 मधे जेव्हा युरोपात ज्यू धर्मीय लोकांचा खूप छळ होत होता तेव्हा त्यांनी ज्यू मुलांसाठी एक अनोखं अनाथाश्रम सुरु केलं. अनाथ मुलं आत्मनिर्भर होतील ह्यावर त्यांचा गाढ विश्वास होता. कोरचोकनी आपल्या अनाथ मुलांना मुलांचेच मंत्रिमंडळ स्थापायला, कोर्ट चालवायला, साप्ताहिक छापण्यासाठी नेहमीच प्रोत्साहन दिले. हिटलरच्या सत्तेत त्यांना वॉर्साच्या घेट्टोमधे जबरदस्तीने डांबण्यात आलं. त्यावेळी अनाथ मुलांसाठी अन्न आणि औषधं घ्यायलाही त्यांच्याकडे पैसे नव्हते पण ते आपल्या तत्वांवर ठाम होते. मुलांपासून वेगळं राहायला त्यांनी नकार दिला. त्या कठीण काळातही ते मुलांना सतत प्रेमाची ऊब देत राहिले.

ओघवती हृदयस्पर्शी भाषा आणि सुंदर चित्रं ह्याच्या साहाय्याने टोमेक बोगास्की ह्यांनी जगाच्या इतिहासातल्या भयंकर कालखंडामध्ये आपलं पूर्ण आयुष्य मुलांसाठी समर्पित करणाऱ्या जानूक कोरचाक ह्या शूर माणसाची गोष्ट सांगितली आहे.



१८८९ च्या पावसाळ्यातील एक दिवस. एक मुलगा पोलंडमधील वॉर्सा शहराच्या जुन्या भागामध्ये भटकत होता, तिथे गरीब आणि उपाशी लोक त्याच्या नजरेस पडले. त्यातील फाटक्या कपड्यातली बरीचशी मुलं अनाथ होती. ते बघून त्याला वाटलं की आपल्याला काय बरं करता येईल ह्या मुलांसाठी? त्याला क्षणभर वाटलं की आपण राजा आहोत आणि पांढऱ्या घोड्यावर बसलो आहोत. आपण ह्या सर्व मुलांसाठी असे एक सुंदर जग तयार करू की जिथे एकही मूल दुःखी नसेल.

ही गोष्ट आहे **जानूस कोरचाक** ह्या महान व्यक्तीची. आपलं सारं आयुष्य त्यांनी मुलांसाठी वाहून घेतलं होतं.





जानूस कोरचाक ह्यांचा जन्म १८७८ मधे वॉर्सा शहरात झाला. त्यांचे मूळ नाव होते हेन्रीक गोल्डस्मिथ. त्यांनी जानूस कोरचाक ह्या टोपणनावाने लेखन केलं आणि ते ह्याच नावाने ओळखले जातात. म्हणून आपणही त्यांना ह्याच नावाने संबोधूया. त्याचं लहानपण वॉर्साच्या राजवाड्याजवळ एका आलिशान घरात गेलं. ते खूप प्रेमात आणि लाडाकोडात वाढले. लाकडाच्या ठोकळ्यानी राज्य बनवायचं आणि मुलांच्या हक्कासाठी लुटुपुटीची लढाई करायची असा खेळ ते एकटेच तासनतास खेळत. ते सतत आपल्याच विश्वात दंग असायचे त्यामुळे त्यांच्या पालकांना त्यांची काळजी वाटायची.



आजीला मात्र त्यांच्या मनातलं बरोबर कळायचं. मोठं झाल्यावर जग सुंदर करण्याचं स्वप्न त्यांनी आजीला सांगितलं आजूबाजूला जशी गरीब-भुकेली मुलं आहेत तसं कुणीही राहू नये यासाठी ते सगळा पैसा खर्च करणार हेही त्यांनी आजीला सांगितलं. आजी त्यांना पंडित म्हणायची.

त्यांना पाचव्या वर्षीच लक्षात आलं की ज्यू असल्यामुळे बाहेर आपल्याला वेगळी वागणूक दिली जाते. त्यांचा लाडका कॅनरी (गाणारा पक्षी) मेला तेव्हा त्यांनी आणि त्यांच्या बहिणीने त्याला अंगणातल्या झाडाखाली पुरायचं ठरवलं.



कॅनरीला स्वर्गात प्रवेश मिळावा ह्यासाठी ख्रिश्चन कबरीवर जसा क्रॉस लावतात तसा क्रॉस तिला पुरलं त्या जागेवर लावावा असं जानूसना वाटतं होतं. परंतु घरच्या मोलकरणीच्या मते कॅनरी पक्षी असल्यामुळे तर चौकीदाराच्या मुलाच्या मते कॅनरी ज्यू असल्यामुळे तिला स्वर्गात प्रवेश निषिद्ध होता. ते ऐकून जानूसना फार वाईट वाटलं.

लहानपणी दाई आणि छोट्या बहिणीबरोबर जानूस सॅक्सन गार्डनमधे फिरायला जायचे. तिथे ते चिमण्यांना दाणे घालायचे. तिथे फिरायला आलेल्या मोठ्या लोकांबरोबर गप्पा मारायला त्यांना आवडायचे.



कधीकधी बाबा त्यांना नदीकिनारी लांबवर फिरायला न्यायचे. तिथे अतिशय कष्ट करणारे लोक त्यांना पाहायला मिळायचे.



बरेचवेळा ते वॉर्सा शहराच्या जुन्या वस्तीत जात. तिथे सगळे गरिबीने गांजलेले लोक राहत. ते पाहून जानूसना पहिल्यांदाच कळलं की इथल्या मुलांना किती वाईट परिस्थितीत राहायला लागतंय.



शाळेमधे मात्र जानूससाठी सगळं काही सहज-सोपं नव्हतं. पोलंडवर रशियाचं राज्य होतं त्यामुळे शाळेत त्यांना रशियन बोलावं लागे. शाळेत मुलांना कुठलेच स्वातंत्र नव्हते. क्षुल्लक चुकीसाठीही मुलांना भरपूर मार मिळायचा. त्याविरोधात कुणी चकार शब्द काढत नसलं तरी हे चुकीचं आहे हे जानूसना कळत होतं.



अकरा वर्षाचे झाल्यावर जानूस ह्यांच्या आयुष्यात मोठी उलथापालथ झाली. त्यांचे लाडके बाबा आजारपणामुळे अंथरुणाला खिळून पडले. सात वर्षांनी ते वारले. जानूसनी कुटुंबाला हातभार म्हणून शिकवण्या घ्यायला सुरुवात केली. परिस्थितीमुळे स्वत:च्याच कुटुंबाचा झगडा पाहून वॉर्सामधील आपल्यापेक्षा गरीब मुलांसाठी काहीतरी करण्याचा जानूस यांचा निर्णय अजूनच पक्का झाला. ते गरीब वस्तीत खाऊ घेऊन जायचे आणि त्यांना धीर द्यायचे. गोरगरीब लोकांचं जीवन सुंदर करण्याचं त्याचं स्वप्न कायम होतं.





रात्री उशिरा घरी आल्यावर ते जानूस कोरचाक ह्या टोपण नावाने लेखन करीत. मुलांना उत्तम शिक्षण मिळावं तसेच चांगलं अनाथाश्रम कसं असावं ह्यावर त्यांनी अनेक लेख आणि पुस्तके लिहिली. लवकरच ते चांगले डॉक्टर, लेखक आणि मुलांच्या हक्कांसाठी लढणारे वकील म्हणून प्रसिद्ध झाले.जेव्हा अनाथ सहायता सोसायटीने ज्यू मुलांसाठी काढलेल्या नवीन अनाथाश्रमाचे डायरेक्टर म्हणून त्यांच्यापुढे प्रस्ताव ठेवला तेव्हा त्यांनी ताबडतोब तो स्वीकारला. मुलाचं भलं व्हावं, त्याचं आयुष्य चांगलं व्हावं हीच त्यांची तळमळ होती. त्यामुळे अनाथाश्रम सुरु करण्यासाठी त्यांनी वैद्यकीय सेवेला रामराम ठोकला.

अनाथालयांचा आणखीन अभ्यास करण्यासाठी कोरचाक पॅरिस, बर्लिन आणि लंडनला जाऊन आले. त्यानंतर आर्किटेक्टबरोबर बसून त्यांनी त्यांच्या कल्पनेतल्या अनाथाश्रामाचा आराखडा तयार केला. गरीब मुलांचं आयुष्य बदलून टाकण्याचं आपलं स्वप्न पूर्ण करण्यासाठी ते सज्ज झाले.



जानूस महाविद्यालयात शिकायला गेले तेव्हा पुढे मुलांसाठी काम करायचं आहे ह्याबद्दल त्यांच्या मनात किंचितही संदेह नव्हता. कॉलेजला ते वैदयकीय शिक्षण घेत होते.

परंतु रशिया-जपान युद्धामुळे त्यांच्या योजनेला खीळ बसली. डॉक्टर म्हणून त्यांनी सेवा केलेल्या तीन पैकी हे पहिले युद्ध होते. त्यांनी जखमी सैनिकांबरोबरच युद्धामुळे होरपळून गेलेल्या आजारी मुलांवरही उपचार केले. लहानपणीच्या लुटुपुटीच्या युद्धापेक्षा खरं युद्ध किती भयंकर असतं हे त्यांनी प्रत्यक्ष पाहिलं.

युद्ध संपल्यावर जानूस दिवसा हॉस्पिटलमधे ज्यू मुलांसाठी काम करायचे तर संध्याकाळी गरीब मुलांवर ते मोफत उपचार करायचे.



१९१२ मधे , “९२ क्रोचमालना स्ट्रीट” वर अनाथाश्रमच्या इमारतीचे काम पूर्ण झाले. जानूस कोरचाक आणि स्टेफ़ानिया विल्ज़िनस्का ह्या दोघांनी मिळून अनाथालयाची जबाबदारी घेतली. मुलांच्या स्वागतासाठी दोघेही सज्ज होते.



कोरचाकांची इच्छा होती की मुलांनी पूर्ण आत्मनिर्भर व्हावं. मुलांनी अनाथाश्रमाचे नियम बनवण्यासाठी निवडणुकीद्वारे प्रतिनिधी नेमले. त्यांनी ठरवलेले नियम कोरचाकसहीत सर्वांना बंधनकारक होतं.



मुलांसाठीचे कोर्ट मुलंच चालवीत. नियम पाळला नाही गेला तर मुलंच शिक्षा ठरवीत. क्षमा करणं हे महत्वाचे मूल्य कोरचाकनी त्यांना शिकवलं होतं. मुलांना त्यांनी हेही सांगितलं की चुका करणं कधी कधी चांगलं असतं. कारण त्यातूनच आपल्याला खूप काही शिकायला मिळतं.



अनाथाश्रमामध्ये मुलं साप्ताहिक चालवायचे. त्यात मुलं, शिक्षक, अनाथ मुलांचे मित्रमंडळी आणि खुद्द कोरचाकही लिहित. दर शनिवारी सकाळचा नाश्ता झाला की कोरचाकबरोबर मुलं त्या आठवड्यात घडलेल्या घडामोडींवर आणि अडचणीवर चर्चा करत.



नवीन मुलं अनाथाश्रामामध्ये दाखल झालं की पहिले तीन महिने त्याला सांभाळण्याची जबाबदारी मोठ्या मुलाकडे दिली जायची. त्या वेळात ते नवं मुलं पुढे येणाऱ्या मुलाची काळजी घ्यायला तयार होऊन जायचं. कोरचाकना एक विशाल कुटुंब बनवायचं होतं. प्रेमळ आणि उबदार वातावरणामुळे मुलं स्वत:ची काम करायला आणि दुसऱ्याची देखभाल करायला पटकन शिकत.

आठवड्यातून एकदा सगळ्या मुलांचे वजन आणि उंची मोजली जायची आणि मग त्यांना आंघोळ घातली जायची. काही मुलांसाठी हा एक नवीन अनुभव असायचा.

मुलांसाठी शुक्रवारची रात्र अगदी खास असायची. त्या दिवशी सजवलेल्या जेवणाच्या खोलीत ज्यूंचा सबाथ साजरा करायचे. मुलं तिकडेच वेगवेगळे खेळ खेळायची, पुस्तकं वाचायची आणि आपला गृहपाठ पूर्ण करायची.

नंतर कोरचाक मुलांना त्यांच्या झोपण्याच्या लांबलचक खोलीत छान छान गोष्टी आणि परीकथा सांगायचे. “पुस इन बुट्स” सारख्या परीकथेमुळे जीवन अनेक आश्चर्यांनी भरलेले आहे आणि कुठलीही बाब शक्य होऊ शकते हे मुलांच्या मनात रुजलं.





खरतर अनाथाश्रम चालवणे ही केवढी मोठी जबाबदारी कोरचाक ह्यांच्या खांद्यावर होती. तरीदेखील आपल्या व्यस्त कामातून कोरचाक मुलांसाठी नेहमी वेगळा वेळ राखायचे. त्यांनी मुलांना शिवणकाम, सुतारकाम ह्यासारखी जीवनकौशल्ये तर शिकवलीच. पण त्याबरोबरीने ते मुलांशी चिक्कार चेष्टा-मस्करी करायचे आणि वेगवेगळे खेळही खेळायचे.



प्रत्येक उन्हाळ्यामध्ये ते मुलांना उन्हाळी शिबिरासाठी दूर गावात घेऊन जायचे. तिथे मुलं शेतात काम करायची, पोहायची, मैदानी खेळ खेळायची आणि जंगलात भटकायला जायची. मुलांच्या वाढ आणि विकासासाठी अभ्यासाइतकीच करमणूकही महत्वाची आहे असे कोरचाक ह्याचे मत होते.





क्रोचमालना मार्गावरच्या अनाथालयाच्या चांगल्या कामामुळे कोरचाक ह्याचे खूप कौतुक झाले. पोलंडमधील कामगारांच्या मुलांसाठी अनाथाश्रम उभारण्यासाठी त्यांना सल्लागार नेमण्यात आले. मार्याना फाल्स्का ह्यांच्याबरोबर आधीच्या ज्यू मुलांच्या अनाथाश्रमसारखेच मुलांचे स्वयंशासन असलेले अनाथालय चालू करून देण्याची जबाबदारी त्यांना देण्यात आली. ह्यावेळी विमानाच्या आकाराची इमारत बांधण्यात आली आणि त्याला “आपले घर” असे नाव देण्यात आले.

कोरचाकनी सर्व जबाबदारी मुलांनी घेतलेले “द लिटिल रिव्ह्यू” नावाचे वृत्तपत्र चालू केले. पोलंडमधील सर्व मुलांनी त्यासाठी मदत करावी अशीही विनंती त्यांनी केली. रोजच्या अडचणींना मुलांनी कसं सामोरं जावं ह्यासाठी त्यांनी रेडीओवर एक कार्यक्रम सुरु केला. त्यांनी एकदा सल्ला दिला, “आई किंवा बाबांना तुम्हाला मारावसं वाटलं तर त्यावेळी त्यांना अर्धा तास थांबायला सांगा. तोपर्यंत ते आपला राग विसरून जाण्याची शक्यता जास्त आहे,”



सगळी मुलं झोपली की कोरचाक कोर्चमानला स्ट्रीटवरच्या आश्रमातील माळ्यावरच्या खोलीत रात्री उशिरापर्यंत लिहित बसत. त्यांनी मुलांसाठी तसेच मोठ्यांसाठी मुलांविषयीची अनेक पुस्तकं लिहिली. ह्याच खोलीत बसून त्यांनी अतिशय प्रसिद्ध असलेले “किंग मॅट द फस्ट” हे पुस्तक मुलांसाठी लिहिले होते.

परंतु त्याच दरम्यान अनाथाश्रमाच्या बाहेरच्या जगात मोठी उलथापालथ सुरु झाली होती. १९३९ मध्ये जर्मनीने पोलंडवर हल्ला केला आणि दुसरे महायुद्ध सुरु झाले. युद्ध्याच्या सुरुवातीच्या दिवसात लहान-मोठ्याना धीर देण्यासाठी कोरचाकना रेडियोवर बोलायला आमंत्रित केले होते.

लगेचच नाझींनी सर्व ज्यू लोकांना बंदिस्त छावणीमधे हलवण्याचा फतवा काढला. त्यामुळे कोरचाक आणि त्यांच्या मुलांना क्रोचमालना स्ट्रीटचे उबदार घर सोडून घेट्टोमधे जावे लागले.

हजारो ज्यूंना घेट्टोमधे कोंबण्यात आले होते. उंच विटांच्या भिंतीभोवती काटेरी कुंपण घालून शहरात त्यांच्यासाठी वेगळ्या वसाहती उभारण्यात आल्या होत्या.

सगळ्या ज्यूंना निळा स्टार असलेली पांढरी पट्टी दंडाला बांधणे सक्तीचे केले होते. कोरचाकनी त्याला नकार दिल्यामुळे त्यांना अटक करण्यात आली.

कोरचाकनी घेट्टोमधेही अनाथाश्रमासारखीच दिनचर्या सुरु करण्याचा प्रयत्न केला. पण तिथली परिस्थिती फारच वाईट होती. क्रोचमालना स्ट्रीटच्या दुप्पट मुलं एकाचं मोठ्या खोलीमध्ये कोंबली होती. त्या एका खोलीतच जेवण्याची आणि झोपण्याची सोय केली होती.

इतक्या अवघड परिस्थितीतही कोरचाक सर्व मुलांना भरपूर प्रेम देण्याचा आणि त्यांची पुरेपूर काळजी घेण्याचा प्रयत्न करीत. ते मुलांसाठी संगीत नाटिका आणि नाटुकली आयोजित करायचे. सगळ्या मुलांकडे लक्ष देता यावं म्हणून ते खोलीच्या मधोमध झोपत. इथेच त्यांनी “घेट्टो डायरी” हे प्रसिद्ध पुस्तक लिहिले.



इथेही दर आठवड्याला मुलांची उंची-वजन मोजले जाई. परंतु अपुऱ्या खाण्या-पिण्यामुळे मुलं दिवसेंदिवस तब्येतीने बारीक आणि अशक्त होत चालली होती.



मुलांसाठी खाणं, पैसे आणि औषधे मिळवण्यासाठी कोरचाक घेट्टोभोवती फिरायला जायचे. येताना शेकोटी पेटवण्यायोग्य जे काही मिळेल ते गोळा करून आणत. घेट्टोमधल्या लहान मुलांना आसरा हव्या असल्यास त्यांना ते आपल्यासोबत घेऊन येत.

अनेक मित्रांनी त्यांची घेट्टोमधून सुटका व्हावी म्हणून मदत देऊ केली पण मुलांना सोडून बाहेर यायला त्यांनी ठाम नकार दिला.

दोन वर्षानंतर नाझींनी लोकांना घेट्टोमधून छळछावणीमधे हलवण्यास सुरुवात केली. ६ ऑगस्ट १९४२ मधे कोरचाकना मुलांसकट छळछावणीमधे जाण्याची नोटीस आली. त्यांनी सगळ्या मुलांना एकत्र केले व एकमेकांचा हात पकडून घेट्टोमधून शांतपणे रांगेने रेल्वे स्टेशनला आणले.

येणाऱ्या-जाणाऱ्या लोकांनी मुलांच्या शिस्तीचे आणि निर्भयतेचे कौतुक केले. त्यांना हे माहीत नव्हते की कोरचाक सोबत असले की मुलांना अगदी सुरक्षित वाटे आणि त्यामुळेच ती शांतपणे रांगेत चालत होती.

मुलं आणि कोरचाक त्रेब्लीन्काच्या गॅस चेंबरमधे मृत्यू पावले. मुलांसाठी आयुष्य वाहून घेतलेलं कोरचाक आणि त्यांचे कर्तृत्व अमर झाले. हॉलोकॉस्टच्या भयंकर छळापासून आपल्या अनाथ मुलांना ते वाचवू शकले नाहीत पण प्रेम, शिक्षण आणि सुरक्षित वातावरण मिळणं हा प्रत्येक मुलाचा हक्क आहे ही त्यांची शिकवण मात्र जगभरातील लोकांना प्रेरणादायी ठरली.

समाप्त



